**नक्षलग्रस्त गडचिरोली जिल्हयातील सुरजागड येथील १) नेंडेर व २) येलचील या ०२ सशस्त्र पोलीस मदत केंद्रासाठी नव्याने निर्माण केलेल्या अस्थायी १०० पदांना मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीटीई-२८१९/प्र.क्र.११२/पोल-३**
मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १४ मार्च, २०२४

**वाचा:-**

१) शासन निर्णय,गृह विभाग क्र.अेपीओ-२८१७/प्र.क्र.१/पोल-३, दि.१४.०९.२०१८.
२) शासन निर्णय,गृह विभाग क्र.अेपीओ-२८१९/प्र.क्र.११२/पोल-३, दि.२१.०९.२०२०.
३) शासन निर्णय,गृह विभाग क्र.अेपीओ-२८१९/प्र.क्र.११२/पोल-३, दि.२६.०३.२०२१.
४) शासन निर्णय,गृह विभाग क्र.अेपीओ-२८१९/प्र.क्र.११२/पोल-३, दि.३०.०९.२०२१.
५) शासन निर्णय,गृह विभाग क्र.सीटीई-२८१९/प्र.क्र.११२/पोल-३, दि.२३.०३.२०२२.
६) शासन निर्णय,गृह विभाग क्र.सीटीई-२८१९/प्र.क्र.११२/पोल-३, दि.१३.०९.२०२३.
७) शासन निर्णय,गृह विभाग क्र.सीटीई-२८१९/प्र.क्र.११२/पोल-३, दि.०१.०३.२०२३.
८) शासन निर्णय,गृह विभाग क्र.सीटीई-२८१९/प्र.क्र.११२/पोल-३, दि.२१.०९.२०२३.
९) सहायक पोलीस महानिरीक्षक (नि. व स.) यांचे पत्र क्र.पोमसं/२६-ब/पो.अ.गडचिरोली/ /१००पदे/मुदतवाढ/२८/२०१९, दि.२६.०२.२०२४.
१०) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२१.०२.२०२४

**शासन निर्णय:-**

उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णय, गृह विभाग क्र.अेपीओ-२८१७/प्र.क्र.१/पोल-३, दि.१४.०९.२०१८ अन्वये नक्षलग्रस्त गडचिरोली जिल्हयातील सुरजागड येथील लोखंडाच्या खाणीच्या संरक्षणासाठी १)नेंडेर व २) येलचील ०२ सशस्त्र पोलीस मदत केंद्राची निर्मिती करण्यास व या ०२ सशस्त्र पोलीस मदत केंद्राकरिता प्रत्येकी ५ पोलीस उप निरीक्षक व ४५ पोलीस शिपाई अशा एकूण १०० पदे निर्माण करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

२. उपरोक्त संदर्भ क्र.८ येथील शासन निर्णय, दि.२१.०९.२०२३ व्दारे उक्त पदांना दि.०१.०९.२०२३ ते दि.२९.०२.२०२४ या कालावधीकरिता मुदतवाढ देण्यात आली आहे. उपरोक्त संदर्भ क्र.९ येथील दि.२६.०२.२०२४ रोजीच्या पत्राव्दारे सहायक पोलीस महानिरीक्षक (नि. व स.), पोलीस महासंचालक कार्यालय यांनी उक्त पदांना दि.०१.०३.२०२४ पासून पुढील कालावधीसाठी मुदतवाढ देण्याची विनंती केली आहे.

३. उपरोक्त दोन सशस्त्र पोलीस मदत केंद्रासाठी निर्माण करण्यात आलेल्या पदांचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| अ)नेंडेर सशस्त्र पोलीस मदत केंद्र | | |
| १. | पोलीस उपनिरीक्षक | ०५ |
| २. | पोलीस शिपाई | ४५ |
| | एकूण | ५० |
| ब) येलचील सशस्त्र पोलीस मदत केंद्र | | |
| १. | पोलीस उपनिरीक्षक | ०५ |
| २. | पोलीस शिपाई | ४५ |
| | एकूण | ५० |
| | | **एकूण अ+ब - १००** |

४. आता सुरजागड येथील **१) नेंडेर व २) येलचील** या ०२ सशस्त्र पोलीस मदत केंद्रासाठीच्या आस्थापनेवरील उपरोक्त तक्त्यात नमूद केलेल्या नव्याने निर्माण केलेल्या १०० अस्थायी पदांना **दिनांक ०१ मार्च, २०२४ ते दिनांक ३१ ऑगस्ट, २०२४ पर्यंत** खालील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

१) सहा महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त पदे वगळून उर्वरित पदांना मुदतवाढ देण्यात यावी. तसेच पदे ज्या कारणास्तव ज्या अटी व शर्तीच्या अधीन राहून मंजूर केली आहेत, त्याचे पालन करण्यात यावे.

५. उपरोक्त खर्च "मागणी क्रमांक बी-१, २०५५-पोलीस-१०९, जिल्हा पोलीस-१०९(००) (०१) जिल्हा पोलीस बल"या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२४-२५ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हा शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दिनांक २१.०२.२०२४ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१४१७३२०९१६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KAILAS ARJUN GAIKWAD

Digitally signed by KAILAS ARJUN GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=47D160717AE29C2D2661B5275D8B9B4CFAE93893BE65A27853145A4C04D865CD, cn=KAILAS ARJUN GAIKWAD
Date: 2024.03.14 17:41:51 +05'30'

**(कैलास गायकवाड)**
**सह सचिव, गृह विभाग**

**प्रत,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) पोलीस उप महानिरीक्षक, गडचिरोली परिक्षेत्र,कॅम्प.
३) जिल्हाधिकारी,गडचिरोली.
४) पोलीस अधीक्षक, गडचिरोली.
५) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई .
६) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
९) वित्त विभाग (व्यय-७) / वित्तिय सुधारणा-१.
१०) निवड नस्ती.